**राज्यातील सर्व विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालये/संस्था इत्यादि येथे प्रवेशाच्यावेळीच लोकसभा, विधानसभा व स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणुकांसाठी विद्यार्थ्यांची नावे मतदार यादीमध्ये नावनोंदणी करण्याची कार्यवाही करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण २०१६/प्र. क्र. ६८३/१६/विशि-३,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १५ मे, २०१७

**प्रस्तावना :-**

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २४३ के व २४३ झेडए अन्वये राज्यातील सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणुका (महानगरपालिका, नगरपरिषदा/नगरपंचायती, जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायती) मुक्त, निर्भय व पारदर्शक वातावरणामध्ये घेण्याची सर्वस्वी जबाबदारी राज्य निवडणूक आयोगाची आहे व त्यासाठी राज्य निवडणूक आयोगाने दिलेले आदेश सर्वांवर बंधनकारक आहेत.

२. आपल्या देशाने लोकशाही पध्दत स्विकारली असून १८ वर्षावरील सर्व व्यक्तींना मतदानाचा हक्क उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सबब १८ वर्षावरील सर्व व्यक्तींनी मतदार यादीमध्ये त्यांची नावे नोंदविणे आवश्यक आहे व होणाऱ्या प्रत्येक निवडणुकीमध्ये मतदान करणे अपेक्षित आहे.

३. केंद्रीय निवडणूक आयोगाकडून तयार होणारी मतदार यादीच स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणुकीसाठी राज्य निवडणूक आयोग वापरते.

४. नवीन मतदारांची नावे नोंदविणे तसेच मतदार याद्यांमध्ये दुरुस्ती करण्याची कार्यवाही भारत निवडणूक आयोगाकडून निरंतर चालू असते. मात्र दरवर्षी सप्टेंबर-ऑक्टोबरमध्ये याकरिता "मतदार यादी पुर्नरिक्षण कार्यक्रम (Summary Revision)" या नावाने धडक कार्यक्रम हाती घेण्यात येतो. या संपूर्ण प्रक्रियेमध्ये भारत निवडणूक आयोगाच्या सूचनेप्रमाणे राज्यातील मुख्य निवडणूक अधिकारी, सर्व जिल्हाधिकारी व सर्व महानगरपालिका आयुक्त, इत्यादि हे आवश्यक ती कार्यवाही करतात. असे असूनही मतदार यादीमध्ये अनेक त्रुटी असल्याच्या तक्रारी वारंवार प्राप्त होतात, उदा.

(i) १ जानेवारीला १८ वर्षे पूर्ण झालेल्या व्यक्तींच्या नावांची नोंदणी न होणे, व
(ii) नमुना क्रमांक ६, ७, ८ व ८-अ यामध्ये माहिती भरूनही मतदार याद्यांमध्ये योग्य ती दुरुस्ती न होणे, इ.

५. वरील तक्रारींचा अभ्यास करता असे दिसून येते की, इयत्ता बारावी उत्तीर्ण होणारी सर्व मुले / मुली (काही अपवाद वगळता) महाविद्यालय / विद्यापीठ तसेच तंत्रशिक्षण व इतर तत्सम शैक्षणिक कार्यक्रमामध्ये प्रवेश घेतात. अशी प्रवेश घेणारी जवळपास सर्व मुले १८ वर्षे पूर्ण केलेली असतात. या सर्व मुला / मुलींची नावे मतदार यादीमध्ये कशाप्रकारे नोंदविता येईल याबाबत अनेक स्तरावर चर्चा होऊन त्याबाबत एक ठोस व्यवस्था निर्माण करण्याबाबत मा. राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य यांनी निर्देशित केले आहे.

६. सदर सर्व बाबींचा विचार करुन शासन खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करित आहे :-

**शासन निर्णय :-**

१. (i) राज्यातील सर्व विद्यापीठे, महाविद्यालये, तंत्रशिक्षण संस्था, इ. यांनी प्रथम वर्षात प्रवेश घेणाऱ्या सर्व मुला/मुलींकडून खालील आशयाचे प्रमाणपत्र / हमीपत्र घेण्याबाबत प्रवेशअर्जामध्ये योग्य ती सुधारणा करावी :

"मी दिनांक ०१/०१/.......... रोजी १८ वर्षाचा / वर्षाची झालो / झाले आहे किंवा होणार आहे. १८ वर्षे पूर्ण झाल्याबरोबर मी माझे नाव मतदार यादीत नोंदवून घेणार आहे अशी मी प्रतिज्ञा करतो / करते. यासाठी सोबत जोडलेला नमुना ६, ७, ८ व ८अ व्यवस्थितपणे भरलेला आहे."

(ii) प्रत्येक महाविद्यालयाच्या प्राचार्यांनी त्यांच्याकडील एका योग्य प्राध्यापकांना या कामासाठी नोडल अधिकारी म्हणून नेमावे. त्यांनी सर्व मुला / मुलींकडून आवश्यकतेप्रमाणे नमुना क्रमांक ६, ७, ८ व ८-अ गोळा करावेत.

(iii) नोडल अधिकारी यांनी वरील भरलेले सर्व फॉर्म कमीत कमी वर्षातून दोनवेळा संबंधित जिल्हाधिकारी किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेले अधिकारी यांच्याकडे सुपूर्द करावेत व पोचपावती घ्यावी.

(iv) मतदार नोंदणी अधिकारी यांनी वरीलप्रमाणे प्राप्त झालेल्या सर्व अर्जांवर (६, ७, ८ व ८-अ) कालबध्द पध्दतीने कार्यवाही करुन योग्य तो निर्णय घ्यावा व मतदार यादीत तशी दुरुस्ती करावी. त्याबाबतची खात्री जिल्हाधिकारी यांनी करावी.

(v) मतदार यादीत नाव नोंदविलेल्या सर्व मुले / मुलींना जिल्हाधिकारी यांनी त्वरित ओळखपत्र द्यावे. त्वरित देणे शक्य नसल्यास वरील ओळखपत्रांचे वाटप दरवर्षी भारत निवडणूक आयोगाद्वारे दि.२५ जानेवारी रोजी साजऱ्या होणाऱ्या "राष्ट्रीय मतदार दिनाच्या" दिवशी करण्यात यावे.

(vi) संबंधित महाविद्यालयांचे प्राचार्य व नोडल अधिकारी यांनी संबंधित जिल्हाधिकारी यांच्याबरोबर समन्वय साधून ही प्रक्रिया बिनचूक राबविण्याची जबाबदारी उचलावी.

२. राज्यातील सर्व विद्यापीठे व तंत्रनिकेतन (शासकीय, निमशासकीय, खाजगी इ.) यांनी वरीलप्रमाणे कार्यवाही करावी.

३. (a) या आदेशानुसार विहित कार्यपध्दती सुरळीत पार पाडण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी तथा जिल्हा निवडणूक अधिकारी यांची राहील. उदा.नोडल अधिकाऱ्यांना प्रशिक्षित करणे, त्यांच्या बैठका / आढावा घेणे, त्यांच्या शंकांचे निरसन करणे, मतदार जागृती अभियानासाठी साहित्त्य पुरविणे, इ.

(b) सदर शासन निर्णय मा.मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांचे सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०५१५१३०७४२६३०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Siddharth Kharat

Digitally signed by Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f8cb55012423727bece629d954713c1ec2962a9ca9b909643170e56321cfd24, cn=Siddharth Kharat
Date: 2017.05.16 16:01:12 +05'30'

(सिध्दार्थ खरात)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत माहितीस्तव व आवश्यक कार्यवाहीस्तव**

१) मा. कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मुख्य निवडणूक अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) सर्व विभागीय आयुक्त
त्यांनी सर्व जिल्हाधिकारी, महानगरपालिका आयुक्त व विद्यापीठांशी समन्वय साधावा.
५) सर्व जिल्हाधिकारी, सर्व महानगरपालिका आयुक्त.
त्यांनी सर्व महाविद्यालये/विद्यापीठांबरोबर संपर्क साधून वरील व्यवस्था पहावी.
६) कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे.
७) संचालक, उच्च शिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई.
१०) संचालक, ग्रंथालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे.
यांनी संबंधित विद्यापीठांशी संलग्नित सर्व महाविद्यालयांच्या प्राचार्यांना कळवून सदर उपक्रमाची अंमलबजावणी होईल याची दक्षता घ्यावी.

**प्रत माहितीसाठी -**

१) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.